**<u>राज्य मानवी हक्क आयोगासाठी जागा-</u>**
**<u>समिती स्थापन करणे.</u>**

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग.
शासन निर्णय क्रमांक एचआरसी ०१९९/३७८(ब)/पोल -१४,
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२,दिनांक:- ९ फेब्रुवारी,२००१.

पहा :- १) शासन निर्णय ,गृह विभाग क्रमांक एचआरसी १०९९/३७८/पोल १४,दि.१५.१.२००१

**<u>निर्णय :-</u>** महाराष्ट्र शासनाने मानवी हक्क संरक्षण अधिनियम १९९३ मधील कलम २१ च्या तरतूदीनुसार महाराष्ट्र राज्यात राज्य मानवी हक्क आयोग निर्माण करण्याचा निर्णय घेतला आहे.उक्त आयोग प्रत्यक्षात कार्यान्वित आणण्यासाठी आवश्यक ती पदे तसेच वाहने,साधनसामुग्री खरेदी करण्यासाठीही आवश्यक ती तरतूद करण्यात आली आहे.

२. राज्य मानवी हक्क आयोगासाठी शासकीय जागा उपलब्ध करुन घेणेबाबत यापूर्वी प्रयत्न करणेत आले.तथापि शासकीय जागा उपलब्ध न झाल्याने आयोगासाठी खाजगी जागा उपलब्ध करुन घेणेचा निर्णय घेण्यात आला आहे.त्यास अनुसरुन वर्तमानपत्रात जाहिरात देऊन संबंधितांचे देकारही मागविण्यात आले आहेत.हे देकार आल्यानंतर यामधील योग्य जागेची शिफारस करणेसाठी एका समितीची स्थापना करणेचे शासनाचे विचाराधीन होते.तद्नुसार आता पुढीलप्रमाणे समिती स्थापन करणेचा निर्णय शासनाने घेतला आहे.

१) श्री.अ.द.कारखानीस - अध्यक्ष
सह सचिव,गृह विभाग,मंत्रालय

२)श्री.शि.वि.नामखेडे - सदस्य
उपसचिव (इमारत)
सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय

३) श्री.ह.भि.तायडे, - सदस्य
उप सचिव , गृह विभाग,
मंत्रालय,

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

( अ. ना. भोसले )
अवर सचिव,महाराष्ट्र शासन,गृह विभाग.

C:\WINDOWS\Desktop\POL-5B\hrc0199@378@pol 14

प्रति,

अप्पर मुख्य सचिव,सामान्य प्रशासन विभाग,मंत्रालय,मुंबई
सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय,मुंबई
श्री.अ.द. कारखानीस ,सह सचिव,गृह विभाग,मंत्रालय,मुंबई
श्री.शि.वि.नामखेडे,उप सचिव,सार्वजनिक बांधकाम विभाग ,मंत्रालय,मुंबई
श्री.ह.भि.तायडे,उप सचिव,गृह विभाग
अप्पर मुख्य सचिव (गृह ) यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (विशेष ) यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव (अ. व सू.) यांचे स्वीय सहाय्यक.

..........